**शासन पुरस्कृत भारत सरकार शिष्यवृत्ती योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन १९९८ च्या पत्रकान्वये विहित केलेल्या अभ्यासक्रमाच्या गटानुसार शासन निर्णय, दि. २१/८/२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या एकूण ६०५ अभ्यासक्रमांत काही बदल करण्याची आवश्यकता आहे किंवा कसे याबाबत शासनास अहवाल सादर करण्याकरीता समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : ईबीसी २०१७/प्र.क्र. १३/शिक्षण,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ७ जून, २०१८

<u>वाचा</u> - शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक २१ ऑगस्ट, २०१७

**<u>प्रस्तावना :-</u>**

केंद्र शासन पुरस्कृत भारत सरकार शिष्यवृत्ती योजनेंतर्गत, केंद्र शासनाने सन १९९८ च्या पत्रकान्वये विहित केलेल्या अभ्यासक्रमाच्या गटानुसार एकूण ६०५ अभ्यासक्रम विहित करण्यास शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सदर अभ्यासक्रमांत यथास्थिती वाढ किंवा बदल करण्याचे अधिकार शासन वा शासन नियुक्त समितीस राहतील असा निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ नुसार विहित करण्यात आलेल्या काही अभ्यासक्रमांना शिष्यवृत्ती लागु करणे, शिष्यवृत्तीसाठी संबंधित विद्यार्थ्यांच्या पालकांची वार्षिक उत्पन्न मर्यादा वाढविणे इ. बाबतची निवेदने शासनास प्राप्त झाली आहेत. याबाबत सर्व संबंधित नियमांचा अभ्यास करुन शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ मध्ये काही बदल करण्याची आवश्यकता आहे किंवा कसे याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यासाठी एक समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

केंद्र शासन पुरस्कृत भारत सरकार शिष्यवृत्ती योजनेंतर्गत, केंद्र शासनाने सन १९९८ च्या पत्रकान्वये विहित केलेल्या अभ्यासक्रमाच्या गटानुसार एकूण ६०५ अभ्यासक्रम विहित करण्यास शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सदर अभ्यासक्रमांत यथास्थिती वाढ किंवा बदल करण्याचे अधिकार शासन वा शासन नियुक्त समितीस राहतील असा निर्णय घेण्यात आला आहे. शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ नुसार विहित करण्यात आलेल्या काही अभ्यासक्रमांना शिष्यवृत्ती लागु करणे, शिष्यवृत्तीसाठी संबंधित विद्यार्थ्यांच्या पालकांचे वार्षिक उत्पन्न मर्यादा वाढविणे इ. बाबतची निवेदने शासनास प्राप्त झाली आहेत. शासनास प्राप्त निवेदनांच्या अनुषंगाने सर्व संबंधित नियमांचा अभ्यास करुन शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ मध्ये काही बदल करण्याची आवश्यकता आहे किंवा कसे याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यासाठी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | समितीमधील अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे | अध्यक्ष |
| २ | आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, म.रा., पुणे | सदस्य |
| ३ | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, म.रा., मुंबई | सदस्य |
| ४ | संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय,म.रा., मुंबई | सदस्य |
| ५ | संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, म.रा. पुणे | सदस्य |
| ६ | श्री. खंडाते, उप संचालक, (शिक्षण) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे | सदस्य |
| ७ | श्री. सास्तुरकर, उपायुक्त, समाजकल्याण, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ८ | प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण (सर्व) | सदस्य |
| ९ | श्री. प्रदिप भोगले, सहायक आयुक्त, समाजकल्याण, पुणे | सदस्य |
| १० | श्रीमती शोभा कुलकर्णी, सहायक संचालक (शिक्षण), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे | सदस्य सचिव |

०२. सदर समितीची कार्यकक्षा ही शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ मध्ये विहित करण्यात आलेल्या ६०५ अभ्यासक्रमांपुरती मर्यादित राहिल, त्यामध्ये कोणताही नविन अभ्यासक्रम जोडता येणार नाही. फक्त ६०५ अभ्यासक्रमांमध्ये काही बदल किंवा इतर सूचना करता येतील.

०३. सदर समितीने, शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ नुसार विहित करण्यात आलेल्या काही अभ्यासक्रमांना शिष्यवृत्ती लागु करणे, शिष्यवृत्तीसाठी संबंधित विद्यार्थ्यांच्या पालकांचे वार्षिक उत्पन्न मर्यादा वाढविणे इ. बाबत शासनास/संचालनालयास प्राप्त झालेल्या निवेदनांच्या अनुषंगाने संबंधित नियमांचा/शासन निर्णयांचा अभ्यास करुन शासन निर्णय, दिनांक २१/८/२०१७ मध्ये काही बदल करण्याची आवश्यकता आहे किंवा कसे याबाबतचा अहवाल शासनास १ महिन्याच्या आत सादर करावा.

०४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०६०७१६५६३३१७२२ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.06.07 17:00:54 +05'30'

(भा.र. गावित)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति -

१. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
२. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, म.रा., पुणे

३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, म.रा., मुंबई
४. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय,म.रा., मुंबई
५. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, म.रा. पुणे
६. श्री. खंडाते, उप संचालक, (शिक्षण) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
७. श्री. सास्तुरकर, उपायुक्त, समाजकल्याण, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण (सर्व)
९. श्री. प्रदिप भोगले, सहायक आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१०. श्रीमती शोभा कुलकर्णी, सहायक संचालक (शिक्षण), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे

**प्रत-**

१. मा. मंत्री (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. सचिव (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. सह सचिव (श्री. गावित) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई
४. अवर सचिव (श्री. ठाकूर) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई
५. निवडनस्ती.